**शासनाचे विभाग व सरकारी वकील /सरकारी अभियोक्ता यांच्यामधील समन्वयाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण -२०२३/८२/का १९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक. ०३ मार्च, २०२३

वाचा: माननीय उच्च न्यायालय, मुंबई यांचे दिनांक ०७.०२.२०२३ रोजीचे क्रिमिनल रिट याचिका क्रमांक. १८७४/२०१७ मध्ये दिलेले आदेश.

## परिपत्रक

माननीय उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिनांक ०७.०२.२०२३ रोजी फौजदारी रिट याचिका क्रमांक १८७४/२०१७ मध्ये आदेश पारित केला आहे, ज्यामध्ये मुख्य सचिव यांना माननीय उच्च न्यायालयाने प्रशासकीय विभागांना सूचना जारी करण्याचे निर्देश दिले आहेत, ज्याद्वारे प्रशासकीय विभागाच्या समन्वय अधिकाऱ्यांना मा.उच्च न्यायालय आणि त्याच्या खंडपीठांमधील त्याचप्रमाणे जिल्हा न्यायालयांमधील सरकारी वकील / सरकारी अभियोक्ता यांच्या कार्यालयाशी प्रभावीपणे संपर्क साधण्याच्या त्यांच्या जबाबदाऱ्याबाबत सूचित करावयाचे आहे.

माननीय उच्च न्यायालय, मुंबई यांनी असेही निरीक्षण नोंदवले आहे की, न्यायालयीन आदेशानंतरही व उच्च न्यायालयातील सरकारी वकील / सरकारी अभियोक्ता यांच्या कार्यालयाने संपर्क साधूनही, मंत्रालयातील प्रशासकीय विभाग प्रतिसाद देत नाहीत किंवा सरकारी वकील / सरकारी अभियोक्ता यांच्या कार्यालयाशी संपर्क साधत नाहीत. परिणामी, सरकारकडून प्रतिसाद न मिळाल्याने, प्रकरणे वेळोवेळी तहकूब करावी लागतात आणि अधिकाऱ्यांवर समन्स बजावणे किंवा प्रकरणी शास्ती लावणे न्यायालयांना भाग पडते.

संदर्भाधिन आदेशाच्या परिच्छेद ६ मध्ये माननीय उच्च न्यायालयाने खालीलप्रमाणे निरीक्षण नोंदविले आहे व निर्देश दिले आहेत :

*"6. It is for the Principal Secretary of the concerned department who is required to effectively supervise the process of giving appropriate instructions to the office of Public Prosecution or Government Pleader in the pending matters before the High Court or other Courts. What has been noticed is for want of such Nodal Officer from each Administrative department process of giving instructions to the officers is delayed and at times the Administrative department, even are not communicating with the office of the Public Prosecution or Government Pleader. As a sequel of which the Courts are constrained to saddle costs or summon the Officers in the Court. In the aforesaid background, we hereby direct that the Chief Secretary of the State shall issue appropriate instructions to the Administrative department, thereby intimating the Nodal Officer who shall be solely responsible for effectively communicating to the office of Public Prosecutor or Government Pleader in the High Court and its Benches, so also the District Courts or in alternate evolve a mechanism to effectively deal and address the above issue."*

यास्तव, माननीय उच्च न्यायालयाच्या उपरोक्त आदेशाच्या अनुषंगाने, सर्व प्रशासकीय विभागांच्या अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांना याद्वारे निर्देश देण्यात येत आहेत की, संबंधित प्रशासकीय विभागांनी नियुक्त केलेले संबंधित समन्वय अधिकारी हे विभाग, मा.उच्च न्यायालय आणि खंडपीठे तसेच जिल्हा

न्यायालयातील सरकारी वकील / सरकारी अभियोक्ता यांच्या कार्यालयाशी प्रभावीपणे समन्वय साधून सूचना प्राप्त करून घेत आहेत व सरकारी वकील / सरकारी अभियोक्ता यांच्या कार्यालयास सत्वर प्रतिसाद देत आहेत, याची खात्री करावी व संबंधित समन्वय अधिका-यांना यासंदर्भात दक्ष राहण्याबाबत सुचना द्याव्यात. पुढे असे ही निर्देश देण्यात येत आहेत की, जेथे प्रशासकीय विभागांनी कोणत्याही कारणास्तव अद्याप समन्वय अधिकाऱ्याची नियुक्ती केलेली नाही,त्यांनी तात्काळ समन्वय अधिकारी नियुक्त करावा, जो मा.उच्च न्यायालय आणि खंडपीठे तसेच जिल्हा न्यायालयातील सरकारी वकील किंवा सरकारी अभियोक्ता यांच्या कार्यालयाशी प्रभावीपणे संपर्क साधण्यासाठी व्यक्तीशः व पूर्णपणे जबाबदार असेल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०३०३१४५३०९२११२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

MANU KUMAR SRIVASTAVA

Digitally signed by MANU KUMAR SRIVASTAVA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=CHIEF MINISTER OFFICE,
2.5.4.20=69e8286c0fd651c2fdd4d5adf53fe4bf7d549093aa9b31ef07ab56c6462c64d0, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=2B26DFB0EC2868CFE96996E8AEE05B95CF10D67702D55FED97107E82D9A153CD, cn=MANU KUMAR SRIVASTAVA
Date: 2023.03.03 18:03:07 +05'30'

**( मनु कुमार श्रीवास्तव )**
महाराष्ट्र शासनाचे मुख्य सचिव

**प्रत अग्रेषित:**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४.मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
५. मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई
६. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मंबई
७. महाधिवक्ता, महाराष्ट्र, मुंबई.
८. सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई
९. सरकारी वकील, उच्च न्यायालय (मूळ शाखा)/(अपील शाखा) आणि (रिट सेल) (अपील शाखा), मुंबई.
१०. सरकारी वकील, उच्च न्यायालय, मुंबई/ खंडपीठ नागपूर आणि औरंगाबाद.
११. सर्व जिल्हा सरकारी वकील, महाराष्ट्र राज्य.